**सार्वजनिक आरोग्य विभागाच्या "ई-हॉस्पीटल (HMIS) संगणक प्रणालीची" कार्यक्षमता वाढविण्यासाठी कृती गटाची (Task Force) स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईजीव्ही-२०१७/प्र.क्र. ०८/ई-गव्हर्नन्स.**
१० वा व ८ वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४००००१.
तारीख: १६ जून, २०१७

वाचा

१) **मा. मुख्यमंत्री महोदयांची दिनांक १७ जानेवारी, २०१७ रोजीची टिप्पणी.**
२) **शासन निर्णय क्रमांक, सा.आ.वि.** क्र.इजीव्ही-२०१३/प्र.क्र.११/ई.गव्हर्नन्स, दिनांक ६ फेब्रुवारी, २०१३

**शासन निर्णय**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत पुरविण्यात येणाऱ्या वैद्यकीय सुविधांचे सुलभिकरण ई-गव्हर्नन्सच्या माध्यमातून जलद व प्रभावीरित्या करण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दि.२४.०१.२०१३, दि.५.१२.२०१५ व दि.२६.०४.२०१६ रोजी पार पडलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये C-DAC या संस्थेने विकसीत केलेल्या "ई-हॉस्पीटल (HMIS) संगणक प्रणाली" टप्या टप्याने राबविण्यास तत्वत: मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच प्रथमत: पथदर्शी (Pilot) स्तरावर जिल्हा सामान्य रुग्णालय, अलिबाग जि. रायगड व विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक या दोन रुग्णालयात सुरु करण्यास तत्कालीन मा.मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीने दि.२६.०२.२०१३ व दि.१४.०३.२०१३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे.

२. जिल्हा सामान्य रुग्णालय, अलिबाग जि. रायगड व विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक या दोन रुग्णालयांमधील "ई-हॉस्पीटल (HMIS) संगणक प्रणाली" कार्यान्वीत झाल्यानंतर त्यांचे मुल्यमापनानंतर. केंद्र शासनाने सूचित केल्याप्रमाणे NIC, Govt. of India द्वारा महाराष्ट्र राज्याकरिता "C-NET" System Integration साठी निवडण्यात आली असून, त्याद्वारे २२ जिल्हा रुग्णालये, १ स्त्री रुग्णालय, १ उप जिल्हा व १ विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय असे एकूण २५ रुग्णालयांचे System Integration चे काम करणे आवश्यक आहे. सदर कामासाठी आवश्यक त्या निधीची तरतूद राष्ट्रीय आरोग्य अभियानामार्फत करण्यात येणार आहे.

३. जिल्हा सामान्य रुग्णालय, अलिबाग जि. रायगड व विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक या दोन रुग्णालयांसाठी आवश्यक हार्डवेअरची खरेदी करण्यात आली असून Vet working चे काम पूर्ण करण्यासाठी C-DAC मार्फत System Integrator ची नियुक्ती करण्यात आली आहे. Cabling / Networking चे काम पूर्ण झाल्यानंतर सदर Pilot प्रकल्प चालू करण्यात येईल.

४. पुढील टप्प्यांमध्ये ई-हॉस्पीटल (HMIS) ह्या संगणक प्रणालीचा राज्यातील सर्व रुग्णालयांमध्ये विस्तार करण्याचे प्रस्तावित आहे.

५. सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दि.०६/०२/२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये ई-हॉस्पीटल (HMIS) प्रकल्पाचे नियोजन व प्रकल्प व्यवस्थापनाचे काम पाहण्यासाठी अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली आहे. आता सदर HMIS प्रकल्पाच्या कामास गती देण्यासाठी या क्षेत्रातील तज्ञांचा समावेश करुन सार्वजनिक आरोग्य विभागाकडील एकत्मिक अशा माहितीचे व्यवस्थापन करण्यासाठी त्याचप्रमाणे प्रत्यक्ष सहभाग देणारे वैद्यकीय अधिकारी व माहिती व्यवस्थापनाशी संबंधित कर्मचारी यांना अत्याधुनिक साधने उपलब्ध करुन देण्यासाठी मा. मुख्यमंत्री यांच्या निदेशानुसार या क्षेत्रातील तज्ञांचा समावेश असलेल्या कृती गटाची (Task Force) स्थापना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे कृती गटाची (Task Force) स्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम | कृती गटातील पद |
|---|---|---|---|
| १ | डॉ. विजय सतबिर सिंग | अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोगय विभाग | अध्यक्ष |
| २ | डॉ. प्रदिप व्यास | आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान | सदस्य सचिव |
| ३ | डॉ. सतिश पवार | संचालक, आरोग्य सेवा | सदस्य |
| ४ | डॉ.विवेक सावंत | व्यवस्थापकीय संचालक, राज्य माहिती महामंडळ. | सदस्य |
| ५ | डॉ. टी. सुंदरारामन | अधिष्ठाता, शालेय आरोग्य प्रणाली, टाटा सामाजिक संस्था | सदस्य |
| ६ | डॉ. बी.एस. गर्ग | अधिष्ठाता, महात्मा गांधी वैद्यकीय विज्ञान संस्था, सेवाग्राम | सदस्य |
| ७ | डॉ. सुभाष साळुंखे | सल्लागार, भारतीय सार्वजनिक आरोग्य संस्था | सदस्य |
| ८ | डॉ. प्रकाश डोके | माजी संचालक, आरोग्य सेवा | सदस्य |
| ९ | डॉ. दिलिप मावळंकर | अधिष्ठाता, भारतीय आरोग्य संस्था, अहमदाबाद | सदस्य |
| १० | श्री. राहुल मलिक | इंडीया कंट्री लिड फॉर डीजीटल ॲन्ड सप्लाय चेन, बील ॲन्ड मेलिंडा गेटस फाऊंडेशन, इंडीया. | सदस्य |
| ११ | डॉ. आनंद बंग | सल्लागार, मुख्यमंत्री कार्यालय | सदस्य |

६. कृती गटाची कार्यकक्षा :- “ई-हॉस्पीटल HMIS) संगणक प्रणाली” करीता गठीत करण्यात आलेले कृती गट (Task Force) राज्यस्तरावरील संपुर्ण प्रकल्पाचे नियोजन व प्रकल्प व्यवस्थापनाचे काम पाहील. C-DAC या संस्थेशी समन्वय साधून “ई-हॉस्पीटल HMIS) संगणक प्रणालीच्या” यशस्वी अंमलबजावणीसाठी सदर कृती गट (Task Force) आवश्यक तो निर्णय घेईल. कृती गटाची बैठक दोन महिन्यातून एकदा घेण्यात येईल. सदर कृती गट आपला अंतिम अहवाल ऑक्टोबर २०१७ पर्यंत शासनास सादर करील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१६१५०४५४९११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Sadashiv Brahmane

Digitally signed by Vijay Sadashiv Brahmane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400035, st=Maharashtra, 2.5.4.20=e1fc96164194fd2f3cf9937aa62233969af536cf8d850897fac8914d5cdd6243, cn=Vijay Sadashiv Brahmane
Date: 2017.06.16 17:09:39 +05'30'

**(वि.स.ब्राम्हणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह सचिव (ई-गव्हर्नन्स), सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई.
५. डॉ.विवेक सावंत, व्यवस्थापकीय संचालक, राज्य माहिती महामंडळ.
६. डॉ. टी. सुंदरारामन, अधिष्ठाता, शालेय आरोग्य प्रणाली, टाटा सामाजिक संस्था
७. डॉ. बी.एस. गर्ग, अधिष्ठाता, महात्मा गांधी वैद्यकीय विज्ञान संस्था, सेवाग्राम
८. डॉ. सुभाष साळुंखे, सल्लागार, भारतीय सार्वजनिक आरोग्य संस्था, मुंबई
१०. डॉ. प्रकाश डोके, माजी संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
११. डॉ. दिलिप मावळकर, अधिष्ठाता, भारतीय आरोग्य संस्था, अहमदाबाद.
१२. श्री. राहुल मलिक, इंडीया कंट्री लिड फॉर डीजीटल अॅन्ड सप्लाय चेन, बील अॅन्ड मेलिंडा गेटस फाऊंडेशन, इंडीया.
१३. डॉ. आनंद बंग, सल्लागार, मुख्यमंत्री कार्यालय
१४. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१५.निवडनस्ती (ई-गव्हर्नन्स) .